**घाटकोपर, मुंबई येथील बेकायदेशीर फलक कोसळून झालेल्या घटनेची उच्चस्तरीय चौकशी करण्यासाठी नेमलेल्या चौकशी समितीला मुदतवाढ देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** HD-32011/4/2024-O/o JT.SECY6-MHD(PG)- Home Department

दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२

तारीख: ११ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांकः** कल्याण-०५२४/प्र.क्र.१३१/पोल-७, दि.१०/०६/२०२४

२) **शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांकः** HD-३२०११/४/२०२४-O/o JT.SECY६-MHD(PG)-Home Department, दिनांक २९/०७/२०२४

**प्रस्तावना :-**

घाटकोपर, मुंबई येथील लोहमार्ग पोलीसांच्या जमिनीवर असलेले बेकायदेशीर फलक दिनांक ३ मे, २०२४ रोजी नजिकच्या पेट्रोल पंपावर कोसळल्याने १६ निरपराध व्यक्तींचा दुर्दैवी मृत्यू झाला होता. या घटनेमुळे शहरातील जाहिरात फलक, विशेषतः शासकीय, पोलीस किंवा रेल्वे मालमत्तांवरील जाहिरात फलक यांची सुरक्षितता आणि कायदेशिरता याबाबत अनेक प्रश्न उपस्थित झाल्याने घाटकोपर, मुंबई येथील जाहिरात फलक दुर्घटनेची समयबध्द चौकशी करण्यासाठी "श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय" यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन क्रमांक ०१ येथील शासन निर्णयान्वये चौकशी समिती गठीत करण्यात आली आहे.

घाटकोपर, मुंबई येथील पेट्रोल पंप आवारातील जाहिरात फलक पेट्रोल पंपावर कोसळणे, या प्रकरणी घटनेस जबाबदार असलेल्या बाबींची चौकशी करणे आणि भविष्यात अशा प्रकारच्या घटनांची पुनरावृत्ती टाळणे या बाबींसाठी शिफारशी करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ०२ येथील शासन निर्णयान्वये श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायमुर्ती यांच्या अध्यक्षतेखालील समितीची रचना व कार्यकक्षा निश्चित करण्यात आली आहे.

श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायमुर्ती यांच्या अध्यक्षतेखालील नेमण्यात आलेल्या समितीमधील काही सदस्यांची फेररचना करणे आवश्यक असल्याने तसेच समितीला आपला अंतिम अहवाल शासनास सादर करण्यासाठी काही कालावधी लागणार असल्याने समितीच्या सदस्यांची

फेररचना करण्याची व समितीस आपला अंतिम अहवाल शासनास सादर करण्यासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

## शासन निर्णय :-

दिनांक १३ मे, २०२४ रोजी घाटकोपर, मुंबई येथे लोहमार्ग पोलीस यंत्रणेच्या जमिनीवरील बेकायदेशीर फलक कोसळल्याने झालेल्या दुर्घटनेची चौकशी करण्यासाठी नेमलेल्या सदस्यांना मदत करण्यासाठी खालील सदस्यांचा समावेश करुन समितीची फेररचना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदनाम | समितीमधील पद | सहाय्य करणारा अधिकारी/ कर्मचारी |
|---|---|---|---|---|
| १ | मा. श्री. दिलीप भोसले | माजी मुख्य न्यायमुर्ती | अध्यक्ष | १) ॲड. भानू चोप्रा<br>२) ॲड. मधुरा शाह (NDB Law मार्फत)<br>३) श्री. आनंद परब, स्टेनोग्राफर (खाजगी व्यक्ती) |
| २ | श्रीमती अश्विनी जोशी | अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपलिका | सदस्य | श्री. किरण दिगावकर, उपायुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका |
| ३ | श्री. निखील गुप्ता | अपर पोलीस महासंचालक, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय | सदस्य | श्री. लखमी गौतम, सह पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई |
| ४ | उप सचिव | पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव | -- |

समितीचे कामकाज पार पाडण्यासाठी आयकर विभागाकडील नामनिर्देशन प्राप्त न झाल्यामुळे अतिरिक्त आयुक्त, आयकर विभाग यांचे समितीमधील सदस्यत्व रद्द करण्यात येत आहे.

घटनेतील आर्थिक बाबींच्या अनुषंगाने शिफारशी करण्यासाठी चार्टर्ड अकाऊंटंट म्हणून किर्तने आणि पंडीत यांच्या-ऐवजी ॲड. यु.एस. गांधी, ॲडव्होकेट आणि चार्टर्ड अकाऊंटंट यांची नेमणूक करण्यात येत आहे.

याशिवाय समितीला आपला अंतिम अहवाल शासनास सादर करण्यासाठी ३१ मार्च, २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

संदर्भाधीन क्रमांक ०१ व ०२ येथील शासन निर्णयांमधील इतर अटी व शर्थी कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१११३२७१४४२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.02.11 13:29:00 +05'30'

**(चेतन निकम)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायमुर्ती तथा अध्यक्ष, चौकशी समिती.
५. अपर मुख्य सचिव, गृह, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस महासंचालक, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१०. महानगरपालिका आयुक्त, बृहन्मुंबई.
११. श्री. निखील गुप्ता, अपर पोलीस महासंचालक, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालय, मुंबई.

१२. श्रीमती अश्विनी जोशी, अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका.
१३. श्री. लखमी गौतम, सह पोलीस आयुक्त, गुन्हे, बृहन्मुंबई.
१४. श्री. किरण दिगावकर, उपायुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका.
१५. ॲड. भानू चोप्रा, खाजगी विधी व्यावसायी.
१६. ॲड. मधुरा शाह, खाजगी विधी व्यावसायी, NDB Law, मुंबई.
१७. किर्तने आणि पंडीत, चार्टर्ड अकाऊंटंट
१८. ॲड. यु.एस. गांधी, ॲडव्होकेटस आणि चार्टर्ड अकाऊंटंट
१९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२१. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती, कार्यासन पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.